तालुका मुख्यालय ते किरकोळ / हॉकर्स केरोसिन परवानाधारकांचे व्यवसायाचे ठिकाण या एकरुप (Uniform) वाहतुक अंतरामध्ये सुधारणा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रॉकेल-२०१४ /प्र.क्र.१६१/ना.पु.२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ०१ एप्रिल, २०१७.

वाचा - शासन निर्णय क्रमांकः अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक : रॉकेल-१३००/६४८०/प्र.क्र.१०००/ना.पु.२७, दि.११ सप्टेंबर,२००२

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत केरोसिनची वाहतूक तेल कंपनीचा डेपो ते तालुका मुख्यालय व तालुका मुख्यालय ते किरकोळ / हॉकर्स केरोसिन परवानाधारकांचे व्यवसायाचे ठिकाण अशाप्रकारे केली जाते. त्यानुसार घाऊक परवानाधारकामार्फत अथवा अर्धघाऊक परवानाधारकामार्फत किरकोळ/हॉकर्स परवानाधारकांच्या व्यवसायाच्या ठिकाणापर्यत होणा-या केरोसिन वाहतुकीसाठी टप्पेनिहाय विहित प्रति किलोलिटर प्रति किलोमीटर दराने वाहतूक खर्च मंजूर केला जातो. तालुका मुख्यालय ते किरकोळ / हॉकर्स परवानाधारकांच्या व्यवसायाच्या ठिकाणापर्यत वाहतुकीचा खर्च म्हणून तत्कालीन परिस्थिती विचारात घेऊन संदर्भाधीन दिनांक ११ सप्टेंबर, २००२ रोजीच्या शासन निर्णयानुसार तालुका मुख्यालय ते किरकोळ/हॉकर्स परवानाधारकांच्या व्यवसायाच्या ठिकाण अशी घाऊक / अर्धघाऊक/ किरकोळ / हॉकर्स यापैकी प्रत्यक्ष वाहतूक करणा-या परवानाधारकास ६७ किलो मीटर (Round Trip Kilometerage) (बृहन्मुंबई वगळून) एवढया समान/एकरुप वाहतूक अंतराचा खर्च मंजूर करण्यात आलेला आहे. तथापि आता बदललेल्या परिस्थितीनुसार सदर ६७ कि.मी. एवढया अंतरात वाढ करण्याबाबत फेडरेशन ऑफ केरोसिन डिलर्स असोशिएशन यांनी शासनास विनंती केलेली आहे. फेडरेशन ऑफ केरोसिन डिलर्स असोशिएशन यांनी केलेल्या विनंतीस अनुसरून दिनांक १०/०२/२०१५ च्या शासन निर्णयान्वये श्री.कृ.ब.इंद्रेकर, उपसंचालक, वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या समितीने तालुका मुख्यालय ते किरकोळ / हॉकर्स परवानाधारकांच्या व्यवसायाचे ठिकाण याकरीता मंजूर करण्यात आलेल्या एकरुप अंतरात सुधारणा करण्याबाबत शासनास शिफारस केलेली आहे. त्यास अनुसरून सदर एकरुप अंतरात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाकडून राज्यास प्राप्त होणा-या केरोसिन कोटयात वेळोवेळी कपात करण्यात आलेली आहे. त्यामुळे सद्य:स्थितीत घाऊक तसेच किरकोळ केरोसिन परवानाधारकांच्या केरोसिन कोटयातही कपात झालेली आहे. ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन आता बदललेल्या परिस्थितीनुसार

तालुका मुख्यालय ते किरकोळ/हॉकर्स केरोसिन परवानाधारकांच्या व्यवसायाचे ठिकाण अशी वाहतुक करणाऱ्या घाऊक/अर्धघाऊक केरोसिन परवानाधारकास द्यावयाच्या वाहतुक खर्चात वाढ करण्याबाबत शासन निर्णय दिनांक १० फेब्रुवारी, २०१५ अन्वये गठीत केलेल्या समितीने शिफारस केलेली आहे. त्यास अनुसरून आता तालुका मुख्यालय ते किरकोळ/हॉकर्स केरोसिन परवानाधारकांच्या व्यवसायाच्या ठिकाणापर्यत केरोसिन पोहोच करण्यासाठी यापुर्वी संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक ११ सप्टेंबर, २००२ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या ६७ कि.मी. (Round Trip Kilometer age) इतक्या एकरुप अंतरामध्ये प्रमाणशीर वाढ करण्याबाबतचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. त्यानुसार आता सदर वाहतूकीचे समान / एकरूप (Uniform) अंतर १०० कि.मी. (Round Trip Kilometer age) (बृहन्मुंबई वगळून) असे मंजूर करण्यात येत आहे. या आदेशाची अंमलबजावणी शासन निर्णयाच्या दिनांकापासून करण्यात यावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०११७०३२०५००६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Patil

Digitally signed by Pradeep Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food,Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=05334a0514755cf2d85a6ca44c91e73cfa81323e994582a4a27e428d216ef701, cn=Pradeep Patil
Date: 2017.04.03 16:34:35 +05'30'

**( प्रदिप पाटील )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व विभागीय आयुक्त
२. सर्व जिल्हाधिकारी
३. नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा मुंबई.
४. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई.
५. श्री.कृ.ब.इंद्रेकर, उप संचालक, वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई
६. सर्व उप आयुक्त (पुरवठा)
७. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
८. सर्व अन्न धान्य वितरण अधिकारी
९. मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
१०. मा.राज्यमंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
११. कक्ष अधिकारी (ना.पू.२१ व ना.पू.२३ ), अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
१२. निवडनस्ती.